पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याच्या योजनेसाठी सन २०१९-२० मध्ये तिसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयसीएस -२०१९/प्र.क्र.९२ /११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
तारीख: २४ जानेवारी, २०२०.

वाचा -

१. शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९
२. भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र क्र.G.२००११/१/ २०१९-EA, दि.१६.५.२०१९
३. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. आयसीएस-२०१९/प्र.क्र.९२/११-अे, दि.२०.६.२०१९.
४. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. आयसीएस-२०१९/प्र.क्र.९२ /११-अे, दि.३०.०७.२०१९
५. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१९/प्र.क्र.३८/११-अे, दि.१९.०९.२०१९
६. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. आयसीएस-२०१९/प्र.क्र.९२ /११-अे, दि.१३.११.२०१९.
७. भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र क्र. F.No.२-३/ २०१९-ASI-ES, दि.३.१.२०१९
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/सां.४/आ.सी.एस./९/२०२०, दि.१३.१.२०२०.

**प्रस्तावना :-**

पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या योजनेकरिता, केंद्र शासनाने, सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्याकरिता दिनांक १६.५.२०१९ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. त्यानुसार राज्य शासनाने पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या योजनेकरीता दि.२०.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

२. पिकांचे आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेतील २२ अस्थायी पदे दिनांक १ ऑक्टोबर, २०१९ ते २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत चालू ठेवण्यास उपरोक्त दिनांक १९.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

३. पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना ही योजना १०० टक्के केंद्र पुरस्कृत असून सन २०१९-२० या वर्षासाठी दि.३०.०७.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये पहिल्या हप्त्यासाठी रु.१०.०९ लाख व दि.१३.११.२०९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दुसऱ्या हप्त्यासाठी रु.४०.४१ लाख इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आता केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिल्यानुसार तिसऱ्या हप्त्याची रु.१२.५० लाख इतकी रक्कम मासिक निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) उपलब्ध करुन देण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने केली आहे. त्यानुषंगाने कृषि आयुक्तालयाच्या प्रस्तावानुसार पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याच्या योजनेसाठी तिसऱ्या हप्त्याव्दारे केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला रु.१२.५० लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत असून या योजनेकरिता सन २०१९-२० साठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या तिसऱ्या हप्त्याची रु. १२.५० लाख इतकी रक्कम पुढील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**(रक्कम रुपये लाखात)**

| अ.क्र. | बाब | सन २०१९-२० मध्ये वितरीत करावयाची बाबनिहाय रक्कम (तिसरा हप्ता) |
|---|---|---|
| १ | **०१-वेतन** | ६.०० |
| २ | **११-देशांतर्गत प्रवास खर्च** | १.७२ |
| ३ | **१३-कार्यालयीन खर्च** | ४.७८ |
| **एकूण** | | **१२.५०** |

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा-

**"मागणी क्रमांक डी-३, २४०१, पीक संवर्धन,**

**(००) (१११) कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी**

**(००) (११) पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना,**

**(१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (२४०१ २५७८)"**

**३.** उपरोक्त निधी केंद्र शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचना, शासनाचे नियम, शासन निर्णय व शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- ५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९ / प्र.क्र.९२ /अर्थ-३/, दि. ८.७.२०१९ नुसार प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२४१२५४५९२२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeta Eknath Shinde

Digitally signed by Neeta Eknath Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f2bffd6992498e56663024368c72b33364cfb066d53682c53a425e54d187a7c1, serialNumber=f325d659f47933958aa2d98f394db95f94be57548776492ba36e77ea1c4aa53b, cn=Neeta Eknath Shinde
Date: 2020.01.24 12:34:24 +05'30'

( निता शिंदे )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
५) उपसचिव (११-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६) कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
७) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
८) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
९) सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
१०) महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११) संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४) नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१५) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३
१६) निवड नस्ती, कार्यासन - ११-अे.